**सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ करिता संस्थांना डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार प्रदान करून त्यांचा सन्मान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१९/प्र.क्र. १००/समन्वय**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२४

**वाचा :-** शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. :- पुरस्कार- २०१७/ प्र.क्र.१९४/ समन्वय, दिनांक १९ एप्रिल,२०१८

**प्रस्तावना :-**

मागासवर्गीय मुला-मुलींच्या शिक्षणासाठी अधिकाधिक सोयी सुविधा उपलब्ध व्हाव्या, त्यांना शासनाकडून देण्यात येणा-या सवलतींचा लाभ मिळावा याकरिता अनुदानित वसतीगृहे, शासकीय वसतीगृहे, निवासी शाळा इत्यादी उपक्रम राबविण्यात येतात. तालुका, जिल्हा व विभागीय स्तरावर शिक्षण घेणा-या मागासवर्गीय विद्यार्थ्यांचा निवास व भोजनाचा प्रश्न सुटावा म्हणून शासकीय व अनुदानीत वसतीगृहे सुरू करण्यात आली आहेत. उपरोक्त मौलिक कार्य करणाऱ्या संस्थांचा दर्जा सुधारावा, प्रवेशितांच्या गुणवत्तेमध्ये वाढ व्हावी या उद्देशाने विविध शासकीय / अनुदानित संस्थांना प्रोत्साहन देण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत कार्यरत अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी शासकीय वसतीगृहे, अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी निवासी शाळा/ आश्रमशाळा व अनुसूचित जातीच्या मुला-मुलींची अनुदानित वसतिगृहे या संस्थांमधुन सर्वोत्तम संस्थांची निवड करुन डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्काराने गौरविण्यात येते. राज्यस्तरावर गुणवत्तेच्या आधारे उत्कृष्ट ठरणाऱ्या शासकीय/ अनुदानित तीन संस्थाना प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कार तसेच, विभागीय स्तरावरावर प्रत्येक प्रवर्गातील एका संस्थेला पुरस्कार प्रदान करण्यात येतो. प्रत्येक महसुली विभागात गुणवत्तेच्या आधारे उपरोक्त तीन प्रवर्गामधून प्रत्येकी एक अशा एकूण तीन याप्रमाणे सहा महसुली विभागाकरीता एकूण १८ पुरस्कार दिले जातात. कोणतीही संस्था एकाच वेळी दोन पुरस्कार मिळण्यासाठी पात्र नसेल. त्यानुषंगाने सदर पुरस्कारासाठी मा. मुख्यमंत्री तथा मा. मंत्री, सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्यस्तरीय समितीने सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ या वर्षांकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार प्रदान करण्याकरिता संस्थांची निवड करून त्यांचा सन्मान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ या वर्षांकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार प्रदान करण्यासाठी पुरस्कारार्थी संस्था यांची मा. मुख्यमंत्री तथा मा. मंत्री, सामाजिक न्याय महोदयांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीने सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मध्ये वर्षनिहाय नमूद केल्यानुसार निवड केली आहे. त्यानुषंगाने सदर संस्थांना डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार प्रदान करून सन्मानित करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. पुरस्कारासाठी निवडलेल्या संस्था पुरस्काराबाबत विहित केलेल्या अटी व शर्ती बाबतचे निकष पूर्ण करीत आहेत तसेच निवड केलेल्या संस्थांनी त्यांना प्राप्त झालेली पुरस्काराची रक्कम संबंधित संस्थेच्या शैक्षणिक विकासासाठीच खर्च करता येईल. या अटीच्या अधीन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर पुरस्काराकरीता निवड करण्यात आलेल्या संस्था यांना पुरस्कार वितरीत करण्याकरीता पुरस्कार वितरण कार्यक्रम आयोजित करण्याची जबाबदारी आयुक्त, समाज कल्याण पुणे यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१९०८५१९०२२ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA SHIVAJI GORVE

Digitally signed by RAVINDRA SHIVAJI GORVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=1cf45fecc49d779b77cc40d48a47afd9acce3cf6f847a274fe9ee5ec9ed23094, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5BF9529B988B3F5AE0952D00630DA49F825A8ED30F32967CC2872941AFCC0742, cn=RAVINDRA SHIVAJI GORVE
Date: 2024.03.08 10:01:34 +05'30'

**( रविंद्र गोरवे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स., मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव,मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१६. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१७. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हापरिषद
१८. सर्व संबंधित व्यक्ती / संस्था.
१९. निवड नस्ती / समन्वय.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१९/प्र.क्र. १००/समन्वय
दिनांक : ०७ मार्च, २०२४
परिशिष्ट “अ”

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार सन २०१९-२०
साठी निवड केलेल्या संस्था
“निरंक”

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार सन २०२०-२१
साठी निवड केलेल्या संस्था
“निरंक”

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार सन २०२१-२२
साठी निवड केलेल्या संस्था

| अ. क्र. | जिल्हा | संस्थेचे पूर्ण नाव व पत्ता संपर्क क्रमांक |
|---|---|---|
| १. | गोंदिया | अनुसूचित जाती व नवबौध्द मुलींची शासकीय निवासी शाळा डव्वा, ता. सडक / अर्जुनी जि.गोंदिया |

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय प्राविण्य पुरस्कार सन २०२२-२३
साठी निवड केलेल्या संस्था

| अ. क्र. | जिल्हा | संस्थेचे पूर्ण नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | सांगली | कासेगाव एज्युकेशन सोसायटीचे सर्वोदय वसतिगृह कासेगांव ता. वाळवा, जि. सांगली पिन कोड नं. ४१५४०४ |
| २. | बीड | अनु.जाती व नवबौध्द मुलांची शासकीय निवासी शाळा, झापेवाडी परिसर शिरुर (का), जि.बीड |
| ३. | हिंगोली | अंब्रेश्वर शिक्षण प्रसारक मंडळ बेरुळा ता.औढा (नागनाथ), जि.हिंगोली. |
| ४. | नागपूर | मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह, ब्राम्हणी, ता.कळमेश्वर, जि.नागपूर |